विशेष सुरक्षा पथकातील कार्यरत पोलीस अधिकारी/कर्मचारी व चालक पोलीस कर्मचारी यांना सातव्या वेतन आयोगाच्या वेतनश्रेणीनुसार प्रोत्साहन (जोखीम) भत्ता मंजूर करणेबाबत.

महाराष्ट्र शासन
गृह विभाग
शासन निर्णय क्रमांकः- एसएसए-०७१९/प्र.क्र.१७२/विशा-४
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक:- ३० जानेवारी, २०२०.

वाचा:-१. शासन निर्णय, गृह विभाग क्र.एसएसए-१०८६/२९४५-I/विशा-४ दि. १० नोव्हें., १९८६
२. शासन निर्णय, गृह विभाग क्र.एसएसए-१०८८/प्र.क्र.९६३/विशा-४, दि. ११ जुलै., १९८९
३. शासन निर्णय, गृह विभाग क्र.एसएसए/१००४/२३३३/प्र.क्र.६५/विशा-४, दि.९.११.२००४
४. शासन निर्णय, गृह विभाग क्र.एपीओ-३१०६/१२१४/प्र.क्र.३११/पोल-३ दि.१४.०६.२००७
५. शासन निर्णय, गृह विभाग क्र.एपीओ-३१०८/६९७/प्र.क्र.२८४/पोल-३ दि.०७.०८.२००८
६. शासन निर्णय, गृह विभाग क्र.एपीओ-३११०/प्र.क्र.४२८/पोल-३ दि.१५ जून, २०११
७. शासन निर्णय, गृह विभाग क्र.एपीओ-३११०/प्र.क्र.४२८/पोल-३ दि.२५ जुलै,२०११
८. शासन निर्णय, गृह विभाग क्र.एसएसए-१०१०/प्र.क्र.३३१/विशा-४, दि.०३.०९.२०११

प्रस्तावना:-

महाराष्ट्र राज्यातील अतिसंरक्षित व्यक्ती तसेच अतिमहत्त्वाच्या संरक्षित व्यक्तींना संरक्षण पुरविणेसाठी महाराष्ट्र शासन संदर्भ क्र.१ येथील दिनांक १० नोव्हेंबर, १९८६ अन्वये आयुक्त, राज्य गुप्तवार्ता विभाग, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्या अधिपत्याखाली विशेष सुरक्षा पथकाची स्थापना करण्यात आली आहे. विशेष सुरक्षा विभागातील पोलीस अधिकारी/ कर्मचारी यांना प्रामुख्याने राज्यातील महत्त्वाच्या, अतिमहत्त्वाच्या संरक्षित व्यक्तींना राजकीय, स्थानिक, दहशतवादी संघटना इत्यांदीपासून व वेळोवेळी उद्भवणा-या प्रसंगी संरक्षण पुरविण्याची जबाबदारी देण्यात आलेली आहे. सदर पथकातील अधिकारी/ कर्मचारी यांना प्रसंगी जीव धोक्यात घालून आपले कर्तव्य पार पाडावे लागते. त्यामुळे अशा प्रकारचे अत्यंत जोखमीचे काम करण्यास पोलीस अधिकारी/ कर्मचारी या पथकात स्वखुशीने यावे म्हणून शासनाने दिनांक १०.११.१९८६ च्या शासन निर्णयान्वये विशेष सुरक्षा पथकातील पोलीस अधिकारी/ कर्मचारी यांना मूळ वेतन + महागाई भत्ता यांच्या एकूण ५०% व चालक पदासाठी ३०% याप्रमाणे प्रोत्साहन (जोखीम) भत्ता अतिरिक्त वेतन म्हणून देण्यास मंजूरी देण्यात आलेली आहे. तसेच, संदर्भ क्र. २ व संदर्भ क्र.४ ते संदर्भ क्र.७ येथील शासन निर्णयान्वये निर्माण करण्यात आलेल्या विशेष सुरक्षा पथकातील मंजूर पदांना सदर प्रोत्साहन योजना लागू करण्यात आली आहे. तसेच संदर्भ क्र.२ येथील दिनांक ०९ नोव्हेंबर, २००४ च्या शासन निर्णयान्वये विशेष सुरक्षा पथकातील पोलीस अधिकारी/ कर्मचारी यांना मूळ वेतन + ग्रेड वेतन + महागाई भत्ता यांच्या ५०% व चालक पदासाठी ३०% या प्रमाणे प्रोत्साहन (जोखीम) भत्ता अतिरिक्त वेतन म्हणून देण्यास मंजूरी देण्यात आलेली आहे. तसेच संदर्भ क्र.८ येथील दिनांक ०३ सप्टेंबर, २०११ अन्वये विशेष सुरक्षा पथकातील कार्यरत पोलीस अधिकारी कर्मचारी व चालक पोलीस कर्मचारी यांना

सहाव्या वेतन आयोगाच्या वेतनश्रेणीनुसार बँड पे + ग्रेड पे यांच्या बेरजेच्या अनुक्रमे ५०% व ३०% या प्रमाणे प्रोत्साहन (जोखीम) भत्ता अतिरिक्त वेतन म्हणून देण्यास मंजूरी देण्यात आलेली आहे.

२. शासन दिनांक ३०.०१.२०१९ अन्व्ये राज्य शासकीय कर्मचारी यांना ७ वा वेतन आयोगाच्या शिफारशी लागू करण्यात आलेल्या आहेत. त्यानुसार विशेष सुरक्षा पथकातील कार्यरत पोलीस अधिकारी/कर्मचारी व चालक पोलीस कर्मचारी यांना सातव्या वेतन आयोगाच्या वेतनश्रेणीनुसार प्रोत्साहन (जोखीम) भत्ता मंजूर करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. त्याअनुषंगाने शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णयः-**

विशेष सुरक्षा पथकातील कार्यरत पोलीस अधिकारी/कर्मचारी व चालक पोलीस कर्मचारी यांना सातव्या वेतन आयोगानुसार मिळणार-या मूळ वेतनच्या अनुक्रमे २५% व १५% इतकी रक्कम प्रोत्साहन (जोखीम) भत्ता म्हणून पूर्वलक्षी प्रभावाने मंजूर करण्यात येत आहे.

विशेष सुरक्षा विभागातील पोलीस अधिकारी/ कर्मचारी यांच्या प्रोत्साहन भत्याबाबतचे सूत्र

**सातव्या वेतन आयोगानुसार मिळणारे मूळ वेतन X ०.२५ = सातव्या वेतन आयोगामधील प्रोत्साहन भत्ता.**

विशेष सुरक्षा विभागातील चालक पोलीस कर्मचारी यांच्या प्रोत्साहन भत्याबाबतचे सूत्र

**सातव्या वेतन आयोगानुसार मिळणारे मूळ वेतन X ०.१५ = सातव्या वेतन आयोगामधील प्रोत्साहन भत्ता.**

या रकमेवर कोणतेही भत्ते अनुदेय राहणार नाहीत.

२. याबाबतचा खर्च संबंधीत पदांचे वेतन व भत्ते ज्या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात येतात त्याच लेखाशीर्षाखाली खर्ची टाकून मंजूर तरतूदीतून भागविण्यात यावा.

३. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.२३/२०२०/व्यय-७, दिनांक २२.०१.२०२० अन्वये प्राप्त सहमतीने निर्गर्मित करण्यात येत आहे.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्रमांक २०२००१३०१५१०२८४४२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षंकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by Babasaheb Sadashiv Khandare
Date: 2020.01.30 14:52:17 +05'30'

**( बाबासाहेब स. खंदारे )**
**कक्ष अधिकारी, गृह विभाग**

**प्रत,**

१. मा.मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.

२. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई - ४०००३२.
३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञयेता), महाराष्ट्र, मुंबई
४. महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई
५. महालेखापाल (लेखा व अनुज्ञयेता), महाराष्ट्र, नागपूर
६. महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, नागपूर
७. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
८. निवासी लेखा अधिकारी, मुंबई
९. अपर मुख्य सचिव (गृह), मंत्रालय, मुंबई - ४०००३२.
१०.पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई
११.पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई
१२.प्रधान सचिव (विशेष), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई-४०००३२.
१३.आयुक्त, राज्य गुप्तवार्ता विभाग, महाराष्ट्र राज्य, मुंबई
१४.विशेष पोलीस महानिरीक्षक (व्हिआयपी सुरक्षा), विशेष सुरक्षा विभाग, मुंबई.
१५.वित्त विभाग (व्यय-७/सेवा-९), मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
१६.गृह विभाग, बीयुडी-१/पोल-१/पोल-१ अ/ पोल-५ ब, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
१७. निवडनस्ती.